# जन वाचन आंदोलन



जनवाचन आंदोलन हे पुस्तकांना गावागावात घेऊन जाणारे आंदोलन आहे. नवसाक्षर व अर्धशिक्षित लोकांमध्ये पुस्तकांचे सामुदायिक वाचन करणे, ते ऐकणे आणि ऐकवणे हा याचा उद्देश आहे. आज गावातल्या लोकांपर्यंत पुस्तके पोचत नाहीत. त्यांची भाषा त्यांना उमगत नाही आणि किंमती परवडत नाहीत. अशा नववाचकांपर्यंत पुस्तके पोचवण्याचे काम भारत ज्ञान विज्ञान समितीने अंगिकारले आहे. ही पुस्तके प्रसिद्ध लेखकांची आणि सोपी, सुटसुटीत व स्वस्त किंमतीत असावीत असा प्रयत्न आहे.

या आंदोलनातून काय साध्य होईल?

गावागावात जनवाचनाची व जनवाचनालयांची संस्कृती निर्माण होईल. साक्षरता आंदोलनातून हस्तगत केलेली अक्षरकौशल्ये लोक स्वत: विकसित करू शकतील. त्यांच्या ज्ञानविज्ञानाच्या कक्षा विस्तारतील. त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जाणिवांची पातळी उंचावू शकेल. आपल्या मूलभूत हक्कांच्या आणि एकंदर परिवर्तनाच्या लढ्यासाठी जागृत होऊन ते उभे ठाकू शकतील.



देशातील लोकशाही टिकण्यासाठी आणि अर्थपूर्ण होण्यासाठी हे आवश्यक आहे. साक्षरता म्हणजे केवळ अक्षर ओळख नव्हे तर संपूर्ण जग जाणण्याचे ते कार्य आहे. या दिशेने, गावागावातील लोकांच्या खांद्याला खांदा भिडवून, आम्ही पुढे जाऊ इच्छितो.

भारत ज्ञान विज्ञान समिती
किंमत रु.२-५०

# सामना बुद्धीचा

लेखक : संजीव
रुपांतर : विनय र. र.



भारत ज्ञान विज्ञान समिती

पुस्तकाचे नाव : सामना बुद्धीचा
लेखक : संजीव
मराठी रुपांतर : विनय र.र.

निर्मिती सहाय्य : गणेश कांबळे

चित्रकार : अस्लम मुल्ला

प्रकाशन : जानेवारी १९९७
जवाआं/म : चौदा

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समिती तर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित



**मूल्य : २ रुपये ५० पैसे**

प्रकाशक / मुद्रक : दत्ता देसाई
राज्य समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समिती (महाराष्ट्र),
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ, पुणे ४११०३०
फोन : ४५६६९४
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे ४

अक्षर जुळणी / मांडणी : दिनानाथ मनोहर

# सामना बुद्धीचा

बुद्धी न मिळे दुकानी । कोणी नेऊ न शके चोरोनी ।।
थोडी अधिक बुद्धी वापरली । सारी दुनिया चमक चमकली ।।
न वापरून कुजवली । अपुली दुनिया काळोखली ।।

बुद्धिमान लोकहो,

ही बुद्धीची कहाणी आहे. बुद्धीनं बुद्धीशी घेतलेल्या झुंजीची. दिलेल्या सामन्याची. बुद्धीने बुद्धीला टाकलेल्या डावाची. बुद्धीने बुद्धीशी घेतलेल्या टकरीची. बुद्धिमान लोक कोण? बुद्धिहीन कोण? निर्बुद्ध कोण? या प्रश्नांची उत्तरे कोण देईल? एक आणि एकच, ती म्हणजे बुद्धीच - दुसरं कोणी नाही. उत्तर या गोष्टीतच ऐका.

काही वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एका शाळेतली. तेथे एक पंडित बुद्धिनाथ होते. आणि एक बुद्दूप्रसाद. एक गुरूजी तर दुसरा शिष्य! पंडित बुद्धिनाथांची ख्याती दूरदूर पसरलेली होती. बुद्दूतल्या बुद्दूलादेखील ते अक्कलवान करतात, मेंदू अगदी घासूनपुसून चकचकीत करतात अशी त्यांची ख्याती होती. शिकवण्याची त्यांची रीतही एकदम वेगळी. एखाद्या गोष्टीपासून सुरूवात करतील आणि पोचवतील तात्पर्यापर्यंत! अगदी नेमका अर्थ कळेल असं. लोकांना बुद्धिनाथांचा खूप अभिमान. आणि बुद्धिनाथांनाही स्वत:चा खूप अभिमान वाटे.

आणि दुसरीकडे त्यांचा नवा शिष्य - गणेश. बुद्धिनाथांना

तो गुळाचा गणपती वाटायचा. अगदी छोट्या छोट्या गोष्टी देखील त्याच्या लक्षात यायच्या नाहीत.

एक दिवस काय झालं...

पंडितजी गोष्ट सांगत होते..

"एक होता मदारी. मदाऱ्याकडं होते दोन प्राणी. एक माकड आणि एक बकरी.मदारी त्यांना घेऊन खेळ करून दाखवायचा. त्यातून मिळणाऱ्या पैशातून तिघांचंही पोट भरायचं. एकदा तिघं चालले होते जत्रेला. वाटेत जेवणाची वेळ झाली. मदाऱ्यानं केळी विकत घेतली. वाटेत दिसलं एक तळं. भोवताली छान झाडी होती. मदाऱ्याला वाटलं, आधी आंघोळ करावी आणि मग जेवावं. मदाऱ्यानं माकड बांधलं एका झाडाला आणि बकरीला बांधलं दुसऱ्या झाडाला. कपडे काढले, जवळच केळी ठेवली आणि गेला आंघोळीला. परत आला तर काय? केळी गायब. कुठेच दिसेनात. मात्र सालं दिसली बकरीसमोर. मदाऱ्यानं माकडाकडं बघितलं. माकड साधूसारखं स्तब्ध बसलं होतं. मदारी म्हणाला, "व्वा बुवाजी! लबाडी माझ्याशी? केळी खाल्ली ती खाल्ली आणि सालं बकरी समोर टाकली." मग मदाऱ्याने माकडाला चांगले चार-पाच फटके हाणले.

गोष्ट संपली.

बुद्धिनाथांनी विचारलं, "मुलांनो, आता सांगा - केळी माकडाने खाल्ली, बकरीने नव्हे हे मदाऱ्याला कसं समजलं?"



त्यांनी समोरच्या मुलाला उभं केलं, म्हटलं,"सांग." तो मान खाली घालून उभा राहिला.

मग दुसऱ्याला उठवलं आणि म्हणाले, "तू सांग."

मुलगा म्हणाला, "मुंगीने सांगितलं असेल."

सगळी मुलं हसू लागली.

शेवटी पंडितजीनीच उत्तर सांगितलं. ते म्हणाले,"केळी बकरीने खाल्ली असती तर सालासकट खाल्ली असती. सालं सोलून आतला गर खाण्याची बुद्धी माकडाला असते. बकरीला नसते. गोष्टीत गर खाल्ला गेला होता आणि सालं पडून राहिली होती. यावरूनच केळी कोणी खाल्ली ते उघड झालं. माकडाने केळीचा गर खाल्ला आणि सालं दिली बकरीसमोर टाकून. का? तर माकडाला वाटलं की मार निर्बुद्ध बकरीला बसेल आणि मदाऱ्याला आपला संशयदेखील येणार नाही."

मुलं गोष्टीत रंगली होती. काही म्हणाली, "वा!" काहींनी केलं "हा!" एक मुलगा नुसताच बसून होता. त्यानं "वा"ही केलं नाही आणि "हा" देखील केलं नाही. तो होता गणेश! पंडितजीना त्याचा राग आला. ते म्हणाले, "काय रे, गुळाचा गणपती, गोष्ट समजली की नाही?"

गणेश उठून उभा राहिला. म्हणाला, "गुरूजी थोडी समजली, थोडी नाही. माकडानं केळीतला गर खाल्ला आणि सालं

बकरीसमोर टाकली.''

गुरूजी म्हणाले, ''हो मग?''

गणेशनं विचारलं, ''पण बकरी सालं खाते. तिच्यासमोर सालं पडली तरी तिने का खाल्ली नाहीत?''

पंडितजी उसळून म्हणाले, ''नाही खाल्ली तर नाही. तुला काय त्याचं?''

गणेश म्हणाला,'' कारण मग सालं मिळाली नसती. आणि मदाऱ्याला केळ्यांचा पत्ताही लागला नसता. ''

पंडितजी कावले, ''मी सांगितलं ना - सालं बकरीसमोर पडली होती.''

गणेश म्हणाला, ''मग बकरीच जास्त हुशार म्हणायला पाहिजे. कारण तिनं सालं खाल्ली नाहीत. त्यामुळं चोरीचा पुरावा शिल्लक राहिला, आणि माकडाचा अप्रामाणिकपणा उघड झाला. मग तुम्ही बकरीला निर्बुद्ध कसं म्हणता?''

पंडितजी संतापानं लालेलाल झाले. म्हणाले, ''खाली बस. बुद्दूप्रसाद.''

मुलं घाबरून गप्प झाली.

मात्र त्यादिवसापासून गणेशचं नाव पडलं बुद्दूप्रसाद! हा होता बुद्धिनाथ आणि बुद्दूप्रसाद यांचा पहिला सामना.



असे सामने पुढेही होत राहिले. दुसऱ्या एका सामन्यानंतर बुद्दूप्रसादचं नाव झालं - सुका ओंडका !

मुलं वरच्या इयत्तेत गेली तेव्हाची गोष्ट आहे. बुद्धिनाथ कविता शिकवत होते. त्यात बाणभट्टाची गोष्ट आली. पंडितजी सांगू लागले,''बाणभट्ट एक थोर कवी होते. ते स्वतः हर्ष-वर्धनाच्या दरबारात असत. 'कादंबरी' हे त्यांचंच खंडकाव्य आहे. ते खूप नावाजलं जातं. त्याच्या रचनेच्या वेळची कथा आहे. झालं काय की, बाणभट्टाचे आयुष्य सरत आलं होतं. कादंबरी अपूर्ण होती. योगायोगानं बाणभट्टाचे दोन्ही मुलगे कवीच होते. बाणभट्ट विचारात पडला. कादंबरी पूर्ण करण्याचे कार्य दोहोंपैकी कोणावर सोपवावे? खंडकाव्य होतं ते. चेष्टा नव्हे. साधीसुधी रचना नव्हती. त्यामुळे हे काम लायक मुलाकडेच सोपवणे आवश्यक होतं. पण लायकी ओळखणार कशी? या कामासाठी कोण पात्र आहे हे ठरवणार कसं?

एकदा बाणभट्टानी मुलांना कविता करायला सांगितलं. मुलांनी विचारलं, ''कोणत्या विषयावर कविता करू?''

बाहेर एक ओंडका पडला होता. त्याच्याकडे बोट दाखवून बाणभट्ट म्हणाले, ''करा त्या ओंडक्यावर!''

परीक्षा अवघड होती. कविता आणि ती सुद्धा ओंडक्याबद्दल! कविता तर केलीच पाहिजे. वडलांची आज्ञा होती ना. दोन्ही मुलांनी आपापल्या प्रतिभेप्रमाणे कवने रचली.

थोरल्यानं लिहीलं, ''समोर दिसतो सुका ओंडका''

धाकट्यानं लिहिलं, ''विलसे नीरस वृक्ष अंगणी''

बाणभट्ट आनंदले, म्हणाले, ''मला वारस मिळाला.''

त्यांनी धाकट्याला जवळ बोलावलं. त्याच्या पाठीवरून हात फिरवला, आणि म्हणाले, ''शाब्बास! माझं राहिलेलं अर्धं काम आता तू पूर्ण कर.''

गोष्ट संपली.

पंडित बुद्धिनाथांनी विचारलं, ''मुलांनो, बाणभट्टांनी घेतलेला निर्णय बरोबर होता की चूक?''

मुलं ओरडली, ''बरोबर.''

बुद्धिनाथ आनंदून म्हणाले, ''शाबास! पण कारण सांगा.''

एक मुलगा म्हणाला, ''दुसरे कवन छान होतं गुरूजी.''

बुद्धिनाथानी विचारलं, ''त्यात छान काय होतं?''

मुलांना सांगता येईना.

बुद्धिनाथ म्हणाले, ''तसं पाहिलं तर दोन्ही कवनेच होती. पण प्रश्न होता त्यातलं चांगलं कवन कोणतं? थोरल्यानं सरळ सोट वर्णन केलं होतं. तर धाकट्यानं अलंकारिकपणे वर्णन केलं होतं. थोरल्यानं केली होती ती कविता नव्हतीच. असली तरी



तिचा दर्जा अगदीच सुमार होता. तो ओंडका तर सुका होताच पण ती कविताही कोरडी ठाक झाली होती. धाकट्याची कलाकृती पहा. त्याने सुक्या ओंडक्याला म्हटलं, 'नीरस वृक्ष.' 'पडला' म्हटलं नाही तर 'विलसे' म्हटलं. अहाहा, काय भाषा! काय प्रतिभा! दोन्हींचा मेळ झाला. सुका ओंडका वृक्ष झाला. याला म्हणतात, कवीची प्रतिभा.''



बोलता बोलता बुद्धिनाथ थांबले. सर्व शिष्य प्रभावित झालेले दिसत होते. बुद्धिनाथांच्या बुद्धीचा प्रभाव पडला होता. पण बुद्दूप्रसाद? त्याच्या चेहऱ्यावर काही चमक दिसत नव्हती.

पंडितजीनी विचारलं, ''काय हो बुद्दूप्रसाद? वरच्या वर्गात आलात. चांगली कविता म्हणजे काय कळलं का?''

बुद्दूप्रसाद उठून उभा राहिला, मात्र काहीच बोलला नाही.

पंडितजींनी विचारलं, ''बोलत का नाही? ''

बुद्दूप्रसाद म्हणाला,''गुरूजी, एक शंका आहे!''

पंडितजी वेडावून म्हणाले,''शंका? लघुशंका की दीर्घ-शंका?'' (लघुशंका म्हणजे लघवी, दीर्घशंका म्हणजे शौचाला होणे)

पंडितजींच्या विनोदावर सर्वजण खिदळले.

बुद्दूप्रसादची चलबिचल झाली नाही. म्हणाला, ''गुरूजी, ओंडक्याला वृक्ष म्हटलं गेलं हे योग्य कसं? तो विलसतो-म्हणजे खुलून दिसतो असं म्हटलं गेलं हे देखील कितपत योग्य आहे?''

पंडितजींच्या डोक्यात संतापाचा स्फोट झाला.'हे कवीचं डोकं आहे. बुद्दूप्रसादचं कांदे बटाटे भरलेलं डोकं नाही. सम-जलं?'' ते ओरडले.

बुद्दूप्रसाद शांतपणे म्हणाला, ''मला मान्य आहे गुरूजी.''

पंडितजी धुसफुसले, ''मग तुला शंका कसली आहे?''

बुद्दूप्रसाद म्हणाला, ''एखादी गोष्ट कशाप्रकारे सागणं जास्त योग्य असतं? जशी आहे तशी सांगणं की ती फुगवून सांगणं? आहे तशीच ती सांगावं की त्यातलं काही गाळून सांगावं?''पंडितजी तापले. तिरकसपणे म्हणाले, ''आपण कशाला चांगलं मानता



महाराज?''

बुद्दूप्रसाद म्हणाला,''कवितेमुळं सुंदर शब्दांचा केवळ आनंद मिळण्यापेक्षा आपली जाण वाढायला हवी आणि ह्या कसोटीवर कविता चांगली की वाईट हे ठरावं, गुरूजी.''

पंडितजी दातओठ खात म्हणाले, ''अच्छा.''

बुद्दूप्रसाद म्हणाला,''धाकट्या मुलात प्रतिभा आहे. पण त्याला कौतुक करून घेण्याचा मोह ही आहे. त्यासाठीच तो बढाईखोरपणा करतो. गोष्ट फुगवून सांगतो. पण त्यामुळं वस्तु-स्थिती समजू शकत नाही. शंका हीच आहे सर.''

बुद्दूप्रसादचे बोलणे कसेबसे पूर्ण होत होतं, पण पंडित बुद्धिनाथांचा धीर सुटला. इतर मुलांकडे पाहून ते म्हणाले, ''अरे काय रे हा मुलगा? विद्यार्थी आहे की बुद्धीचे प्रेत?'' आणि त्याला उद्देशून म्हणाले, ''समोर बसला सुका ओंडका, आता तरी तू चूप होतो का?''

सारा वर्ग खिदळला. काय गणेशची प्रगती? गणेश आधी झाला 'गुळाचा गणपती'. मग 'बुद्दूप्रसाद' आणि आता 'सुका ओंडका'

गणेश गप्प गप्प झाला. मुलं त्याला 'सुका ओंडका' म्हणून चिडवायची. तो हसून ते टाळायचा. आणि बुद्धिनाथ पंडित? ते तर त्याला बघितलं की उखडायचे. अस्वस्थ व्हायचे. त्याचं

कोणतंही बोलणं त्यांना खटकायचेच. आता त्याचे न बोलणंही खटकायला लागलं. 'धरलं तर चावतं, सोडलं तर पळतं' अशी त्यांची स्थिती झाली. होता होता वर्ष ही संपायला आलं.

गुरूजींसमोर 'सुका ओंडका' पडला होता. त्याला शहाणं करायचं होतं. तो जर शहाणा नाही झाला तर? बुद्धिनाथांचे नाव काय राहिलं? प्रतिष्ठा काय राहिली? गुरूजींनी ठरवलं, आता एक घाव, दोन तुकडे. आर नाही तर पार. काहीही होवो. त्याला 'शहाणे' करायचेच!

अशाप्रकारे तिसरा सामना सुरू झाला. तिसरा कशाला? शेवटचाच म्हणा ना!

पंडित बुद्धिनाथ वर्गात आले. एकदम जय्यत तयारीत होते ते. म्हणाले, ''मुलांनो, अभ्यास संपत आला आहे. तेव्हा माझं मनोगत कवितेतच सांगतो-

'अजूनी शिक्षण पूर्ण न झाले
दूर दूर ही वाटच चाले
क्षणोक्षणी होईल परीक्षा
पदोपदी छेडील परीक्षा''

सर्व वर्ग आदराने ऐकत होता. त्यांचा 'सुका ओंडका' गणेश सुद्धा! पंडितजी खूष झाले. मग त्यांनी गोष्ट सांगायला सुरूवात केली. ''ही एक ऐतिहासिक गोष्ट आहे. कौसलचा राजा कुठेतरी जात होता. योगायोग पहा. त्याच रस्त्याने काशीचा



राजा ही येत होता. एकाचवेळी. एकच रस्ता. रस्ता अरूंद. दोन्ही राजे रथात. दोघांचे रथ समोरासमोर येऊन थांबले. आता प्रश्न पडला. आधी कुणी जायचं? दोघेही राजेच. मानापानाचा प्रश्न आला. मागं कोण हटणार? आता काय करायचं?

राजे रथात बसून राहिले. त्यांचे सारथीच एकमेकाशी बोलू लागले. कौसलच्या सारथ्याने म्हटलं, ''तुझा रथ मागे घे. मला रथ काढून जाऊ दे.''

काशीचा सारथी म्हणाला,''तूच रथ मागे घे. माझा रथ काढून जाऊ दे.''

वेळ सरत होता. सारथी हमरीतुमरीवर आले होते. मार्ग निघत नव्हता. शेवटी दोघांत एकमत झालं की, जो राजा श्रेष्ठ आहे त्याचा रथ आधी जाईल. श्रेष्ठपणा मोजायचा गुणांवर.

कौसलचा सारथी म्हणाला, ''आमचे राजे पराक्रमी आहेत. प्रतापी आहेत.''

काशीचा सारथी म्हणाला,''आमचे राजेही पराक्रमी आहेत. प्रतापी आहेत.''

काशीचा सारथी म्हणाला,''आमचे राजेही पराक्रमी आहेत. प्रतापी आहेत.''

कौसलचा सारथी म्हणाला,''आमचे राजे गुणांची कदर राखतात.''

काशीचा सारथी म्हणाला,''आमचे राजे देखील गुणांची कदर करतात.''

तोडीस तोड होत होती. निर्णय काही लागत नव्हता. तेव्हा कौसलचा सारथी म्हणाला, ''आमचे महाराज मित्राशी मित्रासारखे वागतात. शत्रूशी शत्रूप्रमाणे वागतात.'' काशीचा सारथी म्हणाला, ''आमचे महाराज मित्राशी तर मित्राप्रमाणे वागतातच पण शत्रूशीही मित्राप्रमाणे वागतात. ते सत्यप्रिय आहेत. क्षमाशील आहेत. विनम्र आहेत.'' कौसलच्या राजाने हे ऐकलं, आणि त्यानं मान डोलावली. सारथ्याला इशारा केला. सारथ्याने रथ मागे घेतला. तो नतमस्तक होऊन उभा राहिला.

काशीच्या राजाचे मोठेपण सिद्ध झालं होतं. मोठ्या खुशीतच तो निघून गेला.

गोष्ट संपली. बुद्धिनाथांच्या चेहऱ्यावर संतोष दिसत होता. ही उद्‌बोधक गोष्ट ऐकवल्याचं समाधान त्यांना वाटत होतं. त्यांनी विचारलं, ''मुलांनो, हा निर्णय योग्य होता ना?''

विद्यार्थी म्हणाले, ''अगदी योग्य.''

पंडितजी म्हणाले,''बरोबर आहे मुलांनो. मित्राला मित्र तर सर्वच जण मानतात. पण जो शत्रूलाही मित्र मानेल तोच खरा मोठा. जो पराक्रमी आणि प्रतापी असतो तो मोठा तर असेल पण त्याबरोबर तो सत्यप्रिय, क्षमाशील आणि विनम्र ही हवा. नाही का?'' मग गणेशकडे वळत ते म्हणाले,''काय गणेश, बरोबर



आहे ना? आता काही शंका नाही ना?''

गणेश उठून उभा राहिला. सुक्या ओंडक्यासारखा.

पंडितजी प्रसन्नपणे म्हणाले, ''बोल.''



गणेश संकोचून म्हणाला,'' गुरूजी, मी बोललो की तुम्ही नाराज होता.''

पंडितजी त्याला अभय देत म्हणाले, ''नाही होणार नाराज. मग तर झालं. बोल आता.'' गणेश म्हणाला, ''क्षमा असावी. पण ही गोष्टही पुरेशी स्पष्ट नाही. पटण्यासारखी नाही.''

पंडितजी झाले हैराण. या पोराला खुसपटं काढायची सवय झाली आहे. याचं डोकं उलटच चालतं. कैक वेळा ही गोष्ट त्यांनी सांगितली होती. दरवर्षी ते ती सांगत. आजवर सर्वांनी

त्यापासून योग्य तो बोध घेतला होता. सर्वांनी त्या गोष्टीचे मोठेपण स्वीकारलं होतं. पण ह्या ठोंब्यावर काही परिणाम नाही. त्यांनी आपला संताप कसातरी दाबून धरला. त्यांनी विचारलं, ''यातलं काय स्पष्ट नाही?''

गणेश म्हणाला, ''गुरूजी, मोठेपण हे बोलण्यात नव्हे तर वागण्यात, प्रत्यक्ष कृतीत दिसायला हवं होतं.''

पंडितजी जवळ जवळ ओरडून म्हणाले,''तुला काय म्हणायचं आहे?''

गणेश म्हणाला, ''आधी दोन्ही राजांमध्ये राजहट्ट आहे हे दिसतं. दोघांना आपल्या खोट्या थोरवीबद्दल गर्व आहे.''

पंडितजी उसळून म्हणाले, ''अरे तुझ्या डोक्यात काय दगड भरलेत काय? शत्रूशीदेखील मैत्री करणं हा थोरपणा नाही का? त्यात क्षमाशीलता नाही का? त्यात विनम्रता नाही ?''

गणेश शांतपणे म्हणाला,''नक्कीच आहे गुरूजी.''

पंडितजीनी विचारलं, ''तसं असेल तर मग काशीचा राजा थोर नाही का ठरत?''

गणेश म्हणाला,''ठरू शकेल, पण तसा पुरावा असेल तरच.''

पंडितजी म्हणाले, ''त्याच्या सारथ्यांनी वर्णन केलं ना? आता आणखी पुरावा कोठून आणणार?''

गणेश म्हणाला, ''मी म्हणतो त्याला गोष्टीतच पुरावा आहे. काशीचा राजा खरोखरच क्षमाशील, विनम्र असता तर त्यानं आधीच आपला रथ मागं नसता का घेतला? त्यानं आपणहून कौसलच्या राजाला जाऊ दिलं असतं.''

पंडित बुद्धिनाथांचं डोकं गरगरू लागलं, ते म्हणाले,'' अरे बाबा, मग दोघात थोर कोण होता?''

गणेश म्हणाला,''खरं सांगाल तर कुणीच नाही. थोर असणं ही काही गंमत नाही. ती फार अवघड गोष्ट आहे.''

पंडितजी म्हणाले, ''तरीदेखील समजा, दोघांपैकी कुणा एकाला थोर ठरवायचं असेल तर?''

गणेश म्हणाला, ''मग कौसलचा राजा थोर ठरेल गुरूजी. काशीचा राजा क्षमाशील नाही आणि विनम्रही नाही. आणि तसं नसताना तो तसं असल्याचा आव आणतो. कौसलचा राजा मात्र तसा नाही. त्याचा सारथी म्हणाला की तो दुसऱ्याच्या गुणांची कदर करतो. समोरच्या राजाच्या गुणांचे वर्णन ऐकून त्याने त्या गुणांची कदर केली. आणि काशीराजाचा रथ आदरपूर्वक जाऊ दिला. तो क्षमाशील नव्हता आणि तसा दावा ही त्यानं केला नाही. पण तो सत्यप्रिय आणि विनम्र होता. काशीराजा यातील काहीच नव्हता.''

पंडित बुद्धिनाथांनी कपाळावर हात मारून घेतला. मग हताश होऊन ते म्हणाले, ''मी हरलो, तू जिंकलास. मी तुला माणूस बनवू शकलो नाही.

अकलेपाठी घेऊन काही, जात होतो आम्ही
अकलेचे या शत्रू ठरवून, नाव ठेवता तुम्ही
जा सुक्या ओंडक्या, गाढवा, तुझ्या...''

पंडितजी वाक्य पूर्ण करू शकले नाहीत. कारण पाठीमागून मुख्याध्यापक श्री. विवेक आत आले. ते म्हणाले, ''थांबा, गुरूजी.''



पंडितजी चमकून म्हणाले, ''सर, तुम्ही?''

विवेकजी म्हणाले, ''होय मीच. आज मला बोललंच पाहिजे. कोणत्याही मुलाला कधीही अडवू नका. त्याला प्रश्न विचारायला पूर्ण मोकळीक द्या. ते तुम्हाला न पटणारे प्रश्न असले तरी चालेल. वर्षानुवर्षे तुम्ही त्याच त्या गोष्टी शिकवत आलात. तुम्ही त्यांच्याकडे कधी वेगळ्या दृष्टीने बघितलंच नाहीत. आणि कुणी तसं करू लागलं की तुम्ही त्याला चूक म्हणता. मुलांच्या बुद्धीला टोक येऊ दे. ती धारदार राहू दे. मुलांमध्ये उत्सुकतेची आच राहू दे. तुमचे आणि गणेशचे बौद्धिक सामने मला माहीत आहेत. भिंतीआडून ते मी ऐकलं आहेत आणि पाहिलेही आहेत. लक्षात ठेवा, झापडबंद जगणारे काहीही नवीन करू शकत नाहीत. जुन्या आणि त्याच त्या कल्पनांचे गुलाम नसलेले गणेश-सारखी मुलेच काहीतरी नवे घडवू शकतात. तेच प्रगती करू शकतात. मुलं म्हणजे निसर्गाच्या धनुष्यातून सुटलेले बाण आहेत. त्यांना अडवू नका. ते स्वत:च आपला रस्ता शोधतील. खलील जिब्रानने हेच म्हटलं होतं.''

सगळ्यांच्या नजरा गणेशकडं वळल्या.

गणेश बसल्या जागी रडत होता, मूकपणे अश्रू पाझरत. आता यापुढं त्याला कुणीही 'सुका ओंडका' म्हणणार नव्हतं!

*****